भारतीय वन सेवेतील सन २०२२ च्या तुकडीतील अधिकाऱ्यांकरीता "On the Job Training (OJT) प्रशिक्षण आयोजित करण्याकरीता अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. आएफएस ५०२४/प्र.क्र.३७/फ-७अ**

४ था मजला, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:- २२ एप्रिल, २०२४.

**वाचा :-**

१) पर्यावरण, वने व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार यांचे अ.शा.पत्र क्र. १५०११/१०/२०१०- IFS-II, दिनांक १८/०३/२०१६.

२) इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून यांचे पत्र क्र. २८/NFA-२०२४/ ७०.२१/२०२२-२४ Course/Posting of IFS, दिनांक ०३/०४/२०२४.

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म. रा. नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-९/ भावसे/मेंटर- ८/ प्र.क्र.०१ (२४-२५)/७३/२४-२५, दिनांक १५/०४/२०२४.

४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म. रा. नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-९/ भावसे/ मेंटर-८/ प्र.क्र.०१ (२४-२५)/९३/२४-२५, दिनांक १९/०४/२०२४.

**प्रस्तावना:-**

अतिरिक्त संचालक, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून यांच्या संदर्भाधीन दि.०३/०४/२०२४ रोजीच्या पत्रान्वये कळविल्यानुसार, सन २०२२ च्या तुकडीतील भारतीय वन सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील सन २०२२-२०२४ च्या अभ्यासक्रमातील ०७ (सात) परिविक्षाधिन अधिकारी, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून येथे प्रशिक्षण घेत आहेत. सदर परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून येथील अभ्यासक्रमाअंतर्गत चालू असलेल्या व्यावसायीक प्रशिक्षणानंतर ४ महिन्यांच्या "On the Job Training (OJT)" प्रशिक्षणासाठी संबंधित राज्य संवर्गामध्ये संलग्न होण्याकरीता दिनांक २६/०४/२०२४ रोजी मध्यानोत्तर कार्यमुक्त करण्यात येणार असल्याचे उक्त पत्रान्वये कळविण्यात आले आहे. यास्तव, भारतीय वन सेवेतील सन २०२२ च्या तुकडीतील परिविक्षाधिन अधिकारी यांचेकरीता "On the Job Training (OJT)" प्रशिक्षण आयोजित करण्यासाठी कनिष्ठ समय वेतनश्रेणीत (वेतन श्रेणी Level १० in the Pay Matrix) सहाय्यक वनसंरक्षकाची ०७ (सात) अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२२ च्या तुकडीतील, भारतीय वन सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील ०७ (सात) परिविक्षाधीन अधिकारी यांना इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून मधून दिनांक २६/०४/२०२४ मध्यानोत्तर कार्यमुक्त करण्यात येणार आहे.

२. संचालक, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून यांनी संदर्भाधीन दि.०३/०४/२०२४ रोजीच्या पत्रान्वये कळविल्यानुसार उक्त भावसे परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना राज्यात रुजू झाल्यावर

१६ आठवड्यांचे “On the Job Training (OJT)" प्रशिक्षण दिनांक ०६ मे, २०२४ ते दिनांक २५ ऑगस्ट, २०२४ ह्या कालावधीत राज्यातील विविध वनवृत्तामध्ये द्यावयाचे आहे.

३. उक्त परिविक्षाधिन भावसे अधिकाऱ्यांना प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भाधिन पत्रान्वये कळविल्यानुसार खालीलप्रमाणे १६ आठवड्यांचे “On the Job Training (OJT)” प्रशिक्षण आयोजित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| Sr. No. | No. & Week | Attachment |
|---|---|---|
| 1 | 1 Week | Forest HQ Attachment<br>Chandrapur Academy- 3 Days<br>PCCF Office- 2 Days |
| 2 | 1 Week | Division Attachment |
| 3 | 1 Week | Circle Attachment |
| 4 | 1 Week | District Attachment |
| 5 | 12 Week | Range Attachment – Taking independent Charge of the Range. (This includes 4 days attachment with Mantralaya and Maharashtra Legislative Assembly.) |
| **Total** | **16 Week** | |

सदर १६ आठवड्यांच्या प्रशिक्षणा दरम्यान यशदा, पुणे येथे भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिकाऱ्यांसमवेत संयुक्त पायाभुत प्रशिक्षण आयोजित करण्यात आल्यास त्या प्रशिक्षण कालावधीच्या मर्यादेत सदर OJT प्रशिक्षणाचा कालावधी पुढे वाढविण्यात येईल.

४. त्यानुसार भारतीय वन सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील सन २०२२ च्या तुकडीतील परिक्षाविधीन अधिका-यांसाठी राज्यातील १६ आठवड्यांचे “On the Job Training (OJT)” प्रशिक्षण आयोजित करण्यासाठी वन विभागात कनिष्ठ समय वेतनश्रेणीत (वेतन श्रेणी Level १० in the Pay Matrix) सहाय्यक वनसंरक्षकाची, महाराष्ट्र राज्यातील खालील वनवृत्तातील ०७ (सात) अधिसंख्य पदे दिनांक २७/०४/२०२४ ते दिनांक २५/०८/२०२४ या कालावधी करिता निर्माण करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | वनवृत्त | वनविभाग |
|---|---|---|---|
| १. | श्री. अक्षय मिना | गडचिरोली | आलापल्ली |
| २. | श्री. मोहम्मद आझाद | गडचिरोली | गडचिरोली |
| ३. | श्री. पद्मभुषण शिवराम राजगुरु | यवतमाळ | पांढरकवडा |
| ४. | श्री. आयुष क्रिष्णा | अमरावती | मेळघाट(प्रादेशिक) |
| ५. | श्री. पालुवई विष्णु वर्धन रेड्डी | गडचिरोली | सिरोंचा |
| ६. | श्री. सुमित कुमार | चंद्रपूर | मध्य चांदा |
| ७. | श्री. यश सुमेरकुमार काळे | छत्रपती संभाजी नगर | नांदेड |

सदर भारतीय वन सेवा अधिकारी या संवर्गातील अधिसंख्य पदे दिनांक २७ एप्रिल २०२४ ते दिनांक २५ ऑगस्ट, २०२४ या कालावधीसाठी अस्तित्वात राहतील.

५. उक्त अधिका-यांकरीता दिनांक २७ एप्रिल २०२४ ते दिनांक २५ ऑगस्ट, २०२४ या कालावधीकरीता सदर पदावरील वेतन व भत्यापोटी येणारा खर्च "मुख्य लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), १०१ वनसंधारण व विकास, १०१ (०१) प्रशासन व संरक्षण -२४०६ ००९६) ०१- वेतन" या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. त्याचप्रमाणे उक्त परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या "On the Job Training (OJT) प्रशिक्षणाकरिता समन्वय राखण्यासाठी मार्गदर्शक (Mentor) म्हणून श्री. एम.एस.रेड्डी, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोशन, शिक्षण व प्रशिक्षण) तथा पदसिध्द संचालक, चंद्रपूर वन अकादमी, चंद्रपूर यांची नेमणूक करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून व केंद्रीय पर्यावरण, वने व जलवायु परिवर्तन मंत्रालय, नवी दिल्ली यांचे प्रस्तावित १६ आठवड्याच्या कार्यक्रमाच्या वनपरिक्षेत्र कार्यभारादरम्यान स्थानिक स्तरावर नियोजन करून ४ दिवस मंत्रालय / महाराष्ट्र विधानमंडळाच्या कामकाजाची माहिती होण्याच्या दृष्टीने भेट देण्याकरिता मान्यता देण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०१२/ प्र.क्र.६६/ १२/ वित्तिय सुधारणा-१, दि. ११ जुलै २०१२ तसेच, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/ वित्तिय सुधारणा-१, दि. २० फेब्रुवारी, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४२३१०३३१३४२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=223dbaf509e56a22dd8c9d33c199767837144d5824e7011745d9a521fdbedad3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B752370B557D0A3E58B4B069230BC54F6A13D04798D2EE7A3F1C7DCC5655271C, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2024.04.23 15:57:04 +05'30'

**( डॉ. रविकिरण गोवेकर )**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत:-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव / खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्विय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (वने) यांचे स्विय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
७. संचालक, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून,
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (कार्मिक), नागपूर.
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण) चंद्रपूर.

१०.मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे.
११.मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर, अमरावती व गडचिरोली.
१२.संबंधित परिविक्षाधिन भावसे अधिकारी.
१३.महालेखापाल (लेखा व परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर.
१४.कोषागार अधिकारी, नागपूर, अमरावती , चंद्रपुर , संभाजीनगर , नांदेड , यवतमाळ व गडचिरोली.
१५.कक्ष अधिकारी, कार्यासन फ-७, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.सहायक संचालक, भावसे/लेखा कक्ष, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. निवडनस्ती, कार्यासन फ-७अ.